**जिल्हा परिषद कर्मचा-यांसाठी परिभाषित अंशदान**
**निवृत्ती वेतन योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन शुध्दीपत्रक क्रमांक-अंनियो-१००७/प्र.क्र.१८१/आस्था-११
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- १७ मार्च, २०११.

वाचा:- शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.अंनियो-१००७/ प्र.क्र.१८१/आस्था-११, दिनांक २१ मे, २०१०.

## शुध्दीपत्रक

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक अंनियो-१००७/प्र.क्र.१८१/आस्था-११, दिनांक २१ मे, २०१० मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.:-

अ) परिच्छेद क्रमांक ५ मध्ये राज्य अभिलेख देखभाल अभिकरण हे लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई यांच्या प्रशासकीय अधिपत्याखाली सर्व कामे करेल आणि ग्राम विकास व जसंधारण विभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषदांकरिता संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे जिल्हा अभिलेख देखभाल अभिकरणाचे नियंत्रण अधिकारी म्हणून राहतील. या वाक्याच्या पुढे "यासंबंधी जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांबाबत ग्राम विकास व जलसंधारण विभागाचे उपसचिव तथा सहसंचालक/अवरसचिव तथा उपसंचालक हे राज्यस्तरावर प्रमुख नियंत्रण अधिकारी म्हणून राहतील," असे वाचावे.

ब) परिच्छेद क्रमांक १९(इ) च्या खाली पुढीलप्रमाणे (फ) जोडण्यात यावा.

"(फ) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी जिल्हा परिषद शिक्षकांच्या जमा अंशदानाइतके शासन हिश्श्याच्या रकमेची व व्याजाची तरतूद तसेच आवश्यक ते संगणक सांकेतांक मिळवून जिल्हा परिषदांना अनुदान उपलब्ध करुन देण्याची व त्याच्या नियंत्रणाची जबाबदारी शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची राहील."

क) FORM-१/नमुना-१ मधील अनुक्रमांक ४ "Date of joining Govt. service" या ऐवजी "Date of joining Zilla Parishad service" व Form R-१/नमुना आर-१ मधील रकान्यामध्ये "Relationship with Government Servant" ऐवजी "Relationship with Zilla Parishad employee"असे वाचावे.

ड) FORM २/नमुना-२ मधील विवरणपत्रातील आडव्या ओळीतील रकाना क्र.८ नंतर "१०" ऐवजी "९" असे वाचावे.

२. हे शासन शुध्दीपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ५१/११/सेवा-४, दिनांक- ४/३/२०११ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. हे शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०११०३१७१६२२२०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( प्रकाश हिर्लेकर)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१/२ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर. (५ प्रती ),
महालेखापाल ( लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर (५ प्रती),

सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.(५ प्रती)
संचालक, राज्य देखभाल अभिकरण, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा. (प्रत्येकी १५ प्रती)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
मंत्रालयातील सर्व विभाग
मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिपत्याखाली असलेले सर्व विभाग / कार्यालय प्रमुख
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी.
वित्त विभाग (कार्यासन सेवा-४/कोषा-प्र.५ ) मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (कार्यासन आस्था-११.)